**वरुड, जिल्हा अमरावती येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय स्थापन करण्यास आणि या न्यायालयासाठी पद निर्मिती करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत ....**

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

**शासन निर्णय क्रमांकः सीआरसी २०२१/ प्र.क्र.१८९/का.१२,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०७ जुलै , २०२३.

**वाचा :-**

१ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः पदनि २५१२/प्र.क्र.१५७/का.१२, दिनांक २७ जानेवारी, २०१५.

२ शासन निर्णय विधि व न्याय विभाग, क्रमांक कंत्राटी २०१६/प्र.क्र.१९४/का.१२, दिनांक २३ फेब्रुवारी, २०१७.

३ प्रबंधक (निरीक्षणे १), मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे पत्र क्रमांक बी (डब्ल्यू) ए १२२३ of १९८७/१७०९/३२२८६, दिनांक ०८ डिसेंबर, २०२१.

**प्रस्तावना :-**

राज्यातील विविध ठिकाणी न्यायालय सुरु करण्यासाठी प्रलंबित खटले / प्रकरणांची संख्या किमान ५०० असावी, त्याचबरोबर, पायाभूत सुविधा उदा. न्यायालयीन इमारती इ. ची उपलब्धता असावी या मा.उच्च न्यायालयाच्या धोरणानुसार आवश्यक सर्व निकष सकृतदर्शनी पूर्ण होत असल्याचे दिसून येत असल्याने मा.उच्च न्यायालय मुंबई यांचेकडून वरुड, जिल्हा अमरावती येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधिश यांचे न्यायालय स्थापन करण्यास शिफारस करण्यात आली. त्या अनुषंगाने वरुड, जिल्हा अमरावती येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे :

**शासन निर्णय :-**

वरुड, जिल्हा अमरावती येथे जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय स्थापन करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच, या न्यायालयासाठी खाली दर्शविल्याप्रमाणे पदे निर्माण करण्यास आणि बाह्ययंत्रणेद्वारे मनुष्यबळ घेण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :

जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायालय वरुड , जिल्हा अमरावती

| अ. क्र. | पदनाम | पदाची वेतनश्रेणी | नव्याने निर्माण केलेली पदे | बाह्य यंत्रणेद्वारे घ्यावयाच्या सेवा (मनुष्यबळ) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ५ | ६ |
| १ | जिल्हा व अतिरिक्त सत्र न्यायाधिश | Pay in Judiciary Services | १ | -- |
| २ | अधिक्षक | एस १६ ४४९००-१४२४०० | १ | -- |
| ३ | लघुलेखक ग्रेड १ | एस १७ ४७६००-१५११०० | १ | -- |
| ४ | वरिष्ठ लिपिक | एस ८ २५५००-८११०० | ४ | -- |
| ५ | कनिष्ठ लिपिक | एस ६ १९९००-६३२०० | ९ | -- |
| ६ | बेलिफ | एस ६ १९९००-६३२०० | ३ | -- |
| ७ | पुस्तक बांधणीकार (बाह्ययंत्रणेद्वारे) | -- | | १ |
| ८ | शिपाई (बाह्ययंत्रणेद्वारे) | -- | -- | २ |
| ९ | पहारेकरी / सुरक्षारक्षक (बाह्ययंत्रणेद्वारे) | -- | -- | १ |
| १० | सफाईगार (बाह्ययंत्रणेद्वारे) | -- | -- | १ |
| | एकूण | | १९ | ५ |

२. सफाईगार, पहारेकरी / सुरक्षारक्षक या पदांची कामे आवश्यकतेनुसार बाह्ययंत्रणेद्वारे करुन घेण्यात यावी. बाह्ययंत्रणेद्वारे कामे करुन घेताना वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांचे अनुपालन करण्यात यावे.

३. उपरोक्त नमूद पदे ही भरण्यात आलेल्या दिनांकापासून प्रथमत: दिनांक ३१ ऑगस्ट २०२३ पर्यंत चालू ठेवण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत असून सदर अस्थायी पदांना दिनांक ३१ ऑगस्ट, २०२३ नंतर पुढील मुदतवाढ घेणे आवश्यक राहील.

४. यासाठी होणारा खर्च संबंधित आर्थिक वर्षात निधिची तरतुद करुन "मागणी क्रमांक जे १, २०१४- न्यायदान (००) (१०५) दिवाणी व सत्र न्यायालये (०२) जिल्हा व सत्र न्यायाधिश (०२)(०१) जिल्हा व सत्र न्यायाधिश (२०१४ ०१७२) दत्तमत" या लेखाशीर्षाखालील उद्दीष्टांसाठी अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक २८ जून, २०२३ रोजीच्या बैठकीत झालेल्या मान्यतेनुसार व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक६९३/२०२२/आपुक, दिनांक ०८.१२.२०२२ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६६२/२०२३, व्यय-५, दिनांक ०३.०७.२०२३अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०७१८१०२७२८१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2023.07.07 18:11:27 +05'30'

**( विलास व्ही. गायकवाड )**

**विधि सल्लागार -नि- सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरीषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरीषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरीषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. मा.सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई,

९. मा.सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
१०.मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
११.मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई,
१२.सर्व अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई,
१३.सदस्य सचिव, विधि सेवा प्राधिकरण, मुंबई,
१४.संचालक, अभियोग संचालनालय, मुंबई,
१५.प्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई, नागपूर, औरंगाबाद व पणजी खंडपीठ,
१६.सर्व प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालये,
१७.सह संचालक, न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, उत्तन / नागपूर,
१८. महालेखापाल १, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई,
१९.महालेखापाल २, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) नागपूर,
२०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२१.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
२२.जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,
२३.उप जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती,
२४. वित्त विभाग, व्यय ५ / आ.पु.क. मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२५.विधि व न्याय विभागातील सर्व कार्यासने
२६.निवडनस्ती (का.१२)